**राज्य क्षेत्रातील योजना**

लांजा पूरक नळ पाणी पुरवठा योजना, ता. लांजा जि. रत्नागिरी या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-१३०९/प्र. क्र. १२३/ पापु-०६,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १० जुलै, २००९.**

**वाचा :-** **१.** शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : ववेका /किगका-१०९७ / प्र.क्र.-२८९(ड)/पापु-१०, दि. १४.३.१९९७.
**२.** बैठक-२००९/प्र.क्र.६६/पापु-०६,दिनांक - २२.९.२००८ चे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-** लांजा पूरक नळ पाणी पुरवठा योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी या ग्रामीण नळपाणी पुरवठा योजनेच्या रु. १८७.३० लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत संदर्भीय शासन निर्णय क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. या वाढीव खर्चाच्या अनुषंगाने संदर्भीय पत्र क्र. २ अन्वये छोट्या गटाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार लांजा पूरक नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- वरील प्रस्तावानुसार लांजा पूरक नळ पाणी पुरवठा योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी या नळपाणी पुरवठा योजनेच्या **रुपये २१४.४६ लाखाच्या** सुधारित अंदाजपत्रकास तसेच **रु. २७.१६ लाख ( रुपये सत्ताविस लाख सोळा हजार फक्त )** इतक्या वाढीव खर्चास या शासन निर्णयान्वये किमान गरजा कार्यक्रमाखाली मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

**२.** या योजनेच्या प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचेही पालन करण्यांत यावे.

**३.** ही योजना पूर्ण झाल्यावर ती एकाच महसूली गावासाठी असल्याने ती संबंधीत ग्राम पंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग रत्नागिरी यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, तसेच कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

**४.** ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण , दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) याचा दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करणे, निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा

ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नये.

**५.** या योजनेवर होणारा खर्च हा खर्च मागणी क्र. वाय-२,२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२,ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम ( बी ) जिल्हा परिषदांना योजना अंतर्गत अनुदाने ४१ सहाय्यक अनुदान (एक) (डब्युएस-६) ( राज्य क्षेत्र) या पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती / जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७) या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली केलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**६.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. २१ जुलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा **संगणक सांकेतांक २००९०७ ०९१५५१०२००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

**Sd/-**

**( प्र. बा. पवार )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग, ठाणे,
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
सदस्य सचिव (छोटा गट) तथा अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, रत्नागिरी.
संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, महाराष्ट्र शासन, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, रत्नागिरी.
वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी.
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, रत्नागिरी.
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१/२,मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र १/२/मुंबई/नागपूर.
ग्रंथपाल, ग्रंथालय, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग.(कार्यासन-१४७३),मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक,

मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, (श्री. कल्याणकर) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक,
निवडनस्ती कार्यासन पापु-०६.

*************